मा.उच्च न्यायालय,मुंबई खंडपीठ-नागपूर येथील रिट याचिका क्र.१८०६/१७, २४३२/१८, २३५९/१८, ३०१६/१८, ४०९६/१८ व अवमान याचिका क्र.१७७/२०१८ यामध्ये कृषी उत्पन्न बाजार समिती, नागपूर बाबतच्या न्यायालयीन प्रकरणांमध्ये डॉ.आर.एस.सुंदरम (ज्येष्ठ विधिज्ञ) यांचे शुल्क अदा करणेस मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांकः कृबास १०१९/प्र.क्र.४८९/११-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ३० मार्च, २०२४

वाचा :

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५
२) विधी व न्याय विभाग,मंत्रालय,मुंबई यांचे पत्र क्र.७२१-२०१८/ई, दि.१०.०८.२०१८
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थस-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३
४) शासन समक्रमांक शासन निर्णय दि.०६.०३.२०२३

**शासन ज्ञापन**

श्री.सुनिल महादेवराव देशमुख व इतर ४ यांनी कृषी उत्पन्न समिती, नागपूर यांचे निवडणूकी संदर्भात शासनाच्या विरोधात मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ-नागपूर येथे रिट याचिका क्र.१८०६/२०१७, २४३२/१८,२३५९/१८, ३०१६/१८, ४०९६/१८ व अवमान याचिका क्र.१७७/२०१८ दाखल केली होती. सदर रिट याचिकेमध्ये प्रतिवादी महाराष्ट्र शासन आहे. या प्रकरणांमधील सर्व याचिका क्लिष्ट स्वरूपाच्या असल्याने शासनाच्या वतीने योग्य बाजू मांडण्याकरीता विशेष वकील (ज्येष्ठ विधिज्ञ) म्हणून वाचा येथील क्र.३ वरील दिनांक १०.०८.२०१८ च्या पत्रान्वये डॉ.आर.एस.सुंदरम यांची नियुक्ती करण्यात आली होती.

या प्रकरणामध्ये श्री.आर.एस.सुंदरम, ज्येष्ठ विधिज्ञ यांना मान्य केलेले व्यावसायिक शुल्क रु. १२,७४,५००/- (अक्षरी रुपये बारा लाख चौऱ्याहत्तर हजार पाचशे फक्त ) इतकी रक्कम या शासन ज्ञापनान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधीतून श्री. आर.एस.सुंदरम (ज्येष्ठ विधिज्ञ) यांनी शासनास सादर केलेल्या देयकानुसार रु.१२,७४,५००/- इतक्या व्यावसायिक शुल्कापैकी आयकर अधिनियमानुसार देयकातून (आयकर अधिनियम १९६१ च्या १९४ (१) मधील तरतूदीनुसार) १०% आयकर (रु.१,२७,४५०/-) तसेच आयकर रकमेवर ४% शैक्षणिक अधिभार (रु. ५०९८/-) अशी एकूण रु. १,३२,५४८/- कपात केल्यानंतर उर्वरित रु. ११,४१,९५२/-(अक्षरी रुपये अकरा लक्ष एक्केचाळीस हजार नऊशे बावन्न फक्त) R.S.Sundaram, Union Bank of India, Branch - Gokulpeth, Nagpur, Account number - 349802010001773 (SB General), IFSC Code - UBIN0534986 यांच्या नावे RTGS द्वारे करण्यात यावी. त्यांचा पॅन क्रमांक ACRPR3157J असा आहे.

३. यासाठी येणारा खर्च मागणी क्र. व्ही-२, ३४५१ सचिवालयीन आर्थिक सेवा, ०९० सचिवालय (०१) (०१) सचिवालयीन आर्थिक सेवा (अनिवार्य), (३४५१ ०३०४) २८, व्यावसायिक सेवा या लेखाशिर्षांतर्गत चालु वर्षी मंजूर झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. सदर निधी अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून आहरण करुन त्याचे वितरण करण्यासाठी श्री. सं.पु.खोरगडे, सह सचिव (सहकार व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व श्री.सु.पु.पांगारकर, कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या शासन ज्ञापनान्वये मंजूर केलेली रक्कम अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथून आहरित करुन संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी यांनी करावी.

५. सदरहू शासन ज्ञापन उपरोक्त वाचा क्र.१ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये नमूद केल्यानुसार वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग चार, अनुक्रमांक ११ व महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ मधील नियम १६६ अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या पुर्ण अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३२५/२०२४/व्यय-२, दि.२८.०३.२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३३०१६४६५९१५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHAILESH
SHASHIKANT SURVE

Digitally signed by SHAILESH SHASHIKANT SURVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=de61ac402ef01eec8d6c6d90fb32c82cc308744e2b851cc16fb39fe7ce1f1dd3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0E8ED2F069FE90F6EA4E2DFC43BD83581600732F141DAF3517043067D7724F4B, cn=SHAILESH SHASHIKANT SURVE
Date: 2024.03.30 16:56:42 +05'30'

**( शैलेश श.सुर्वे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर
२. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर
३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
४. सरकारी वकील,मुळ शाखा, मा.उच्च न्यायालय, रिट सेल, मुंबई
५. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. विधी व न्याय विभाग ( ई-शाखा ) शाखा, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
७. महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
८. अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
९. कार्यासन अधिकारी(रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय (३ प्रतीत)
१०. डॉ.आर.एस.सुंदरम, मा.मुंबई उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ, नागपूर
११. निवडनस्ती-११स